# महाराष्ट्र शासन

## वित्त विभाग

शासन निर्णय, क्रमांक अरजा-२४९०/१६१/सेवा-९,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक १ जानेवारी १९९१.

पहा.—शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक अरजा-२४८८/३९५/सेवा-९, दिनांक ९ नोव्हेंबर १९९०

## शासन निर्णय

शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक अरजा-२४८८/३९५/सेवा-९, दिनांक ९ नोव्हेंबर १९९० अन्वये राज्य शासकीय कर्मचाऱ्यांच्या अर्जित व अर्धवेतनी रजा गणना करण्याच्या पद्धतीमध्ये बदल करण्यात आला आहे. त्यानुसार प्रत्येक अर्धवर्षासाठी १ जानेवारी व १ जुलै रोजी प्रत्येकी १५ दिवस याप्रमाणे अर्जित रजा आगाऊ जमा करण्याचे आदेश आहेत. यासंबंधात असे निदर्शनास आणण्यात आले आहे की, अशा रीतीने अर्जित रजा आगाऊ जमा केल्यामुळे व ती २४० या कमाल मर्यादेला सीमित केल्यामुळे आगाऊ रजा जमा करण्याची ही पद्धत काही कर्मचाऱ्यांचे बाबतीत फायदेशीर न ठरण्याची शक्यता आहे. अशा कर्मचाऱ्यांचे नुकसान टाळण्याच्या दृष्टीने शासन खालील-प्रमाणे आदेश देत आहे :—

(१) वर्षाच्या १ जानेवारी अथवा १ जुलै रोजी ज्या कर्मचाऱ्यांच्या अर्जित रजा खाती २२५ दिवस किंवा त्यापेक्षा कमी अर्जित रजा शिल्लक असेल त्यांच्या बाबतीत १५ दिवस अथवा जर ते पुढील अर्धवर्षामध्ये सेवानिवृत्त होणार असतील किंवा सेवा सोडून जाणार असतील तर यथाप्रमाण कमी अर्जित रजा त्यांचे खाती आगाऊ जमा करण्यात यावी.

(२) वर्षाच्या १ जानेवारी किंवा १ जुलै रोजी ज्यांच्या खाती २४० दिवस किंवा त्यापेक्षा कमी परंतु २२५ दिवसांपेक्षा जास्त अर्जित रजा शिल्लक असेल अशा प्रकरणी आगाऊ जमा करावयाची १५ दिवस अर्जित रजा स्वतंत्र दाखविण्यात यावी आणि त्या अर्धवर्षामध्ये कर्मचारी जेवढी अर्जित रजा घेईल तेवढी अर्जित रजा अशा रीतीने स्वतंत्र दाखविण्यात आलेल्या १५ दिवसांच्या अर्जित रजेशी प्रथम समायोजित करावी. संबंधित अर्धवर्षामध्ये जर कर्मचाऱ्याने १५ दिवसांपेक्षा जास्त अर्जित रजा उपभोगिली असेल तर १५ दिवसांपेक्षा जास्त घेण्यात आलेली रजा शिल्लक अर्जित रजेमधून वजा करण्यात यावी. असे केल्यानंतर जी अर्जित रजा शिल्लक राहील ती कर्मचाऱ्याच्या अर्जित रजा खाती, २४० दिवसांच्या मर्यादेच्या अधीन राहून, अर्धवर्षाचे शेवटी जमा करण्यात यावी.

उदाहरणार्थ

(१) जर १ जानेवारी १९९१ रोजी कर्मचाऱ्याच्या अर्जित रजा खाती २२५ दिवस अर्जित रजा शिल्लक असेल तर तो त्या अर्धवर्षामध्ये जर सेवानिवृत्त होणार नसेल तर त्याच्या रजा खाती १५ दिवस अर्जित रजा आगाऊ जमा करण्यात येईल.

(२) दिनांक १ जानेवारी १९९१ रोजी कर्मचाऱ्याच्या रजा खाती २४० दिवस अर्जित रजा शिल्लक असल्यास आणि (अ) जर त्याने १ जानेवारी १९९१ ते दिनांक ३० जून १९९१ या अर्धवर्षामध्ये १५ दिवस अर्जित रजा घेतली तर, घेतलेली अर्जित रजा दिनांक १ जानेवारी १९९१ रोजी जमा करण्यासाठी म्हणून स्वतंत्र रीत्या दाखविण्यात आलेल्या १५ दिवसांशी प्रथम समायोजित करण्यात येईल. (ब) तथापि जर त्याने दिनांक ३० जून १९९१ रोजी संपणाऱ्या अर्धवर्षामध्ये फक्त १० दिवस अर्जित रजा घेतली तर दिनांक १ जानेवारी १९९१ रोजी त्याच्या खाती जमा करण्यात यावयाच्या १५ दिवस अर्जित रजेशी प्रथम ती समायोजित करण्यात येईल व त्या व्यतिरिक्त शिल्लक राहिलेली ५ दिवस अर्जित रजा त्याच्या अर्जित रजा खाती जमा केली जाणार नाही. म्हणजेच दिनांक १ जुलै १९९१ रोजी त्याच्या खाती २४० दिवस अर्जित रजा शिल्लक राहील.

(३) जर दिनांक १ जानेवारी १९९१ रोजी कर्मचाऱ्याच्या रजा खाती २३० दिवस अर्जित रजा शिल्लक असेल आणि (अ) जर त्याने दिनांक ३० जून १९९१ रोजी संपणाऱ्या अर्धवर्षामध्ये १५ दिवस अर्जित रजा घेतली तर अशी रजा दिनांक १ जानेवारी १९९१ रोजी त्याच्या रजा खाती जमा करावयाच्या १५ दिवसांच्या अर्जित रजेशी समायोजित करण्यात येईल आणि दिनांक १ जुलै १९९१ रोजी त्याचे खाती २३० दिवसच अर्जित रजा शिल्लक राहील. (ब) जर त्याने या अर्धवर्षात फक्त १० दिवसांची अर्जित रजा घेतली तर ही रजा प्रथम त्याचे खाती दिनांक १ जानेवारी १९९१ रोजी जमा करावयाच्या १५ दिवसांच्या अर्जित रजेशी समायोजित करण्यात येईल आणि शिल्लक ५ दिवस अर्जित रजा त्याचे खाती जमा करण्यात येईल, म्हणजेच त्याचे खाती दिनांक १ जुलै १९९१ रोजी २३५ दिवस इतकी अर्जित रजा जमा होईल.

२. शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक अरजा-२४८८/३९५/सेवा-९, दिनांक ९ नोव्हेंबर १९९० मध्ये एखाद्या शासकीय कर्मचाऱ्याने कॅलेंडर अर्धवर्षाच्या शेवटी सुरू होणारी परंतु पुढील कॅलेंडर अर्धवर्षामध्ये संपेल अशी अर्जित रजा घेतली तर तिचा हिशेब कसा करण्यात यावा हे त्या सोबत असलेल्या जोडपत्रामध्ये दर्शविण्यात आले आहे. आता या शासन निर्णयामधील तरतुदी विचारात घेऊन, वरील जोडपत्रामध्ये दाखविण्यात आलेल्या उदाहरणांत या सोबतच्या जोडपत्राप्रमाणे बदल करण्यात यावा.

३. वरील आदेश दिनांक १ जानेवारी १९९१ पासून अंमलात येतील.

४. महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ मध्ये आवश्यक त्या सुधारणा यथावकाश करण्यात येतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

अ. ना. कुळकर्णी,
शासनाचे उप सचिव.

(शा.म.मु.) एच २४११ (१९,०००—१-९१)

महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १, महाराष्ट्र, मुंबई (८० प्रती),
महालेखापाल (लेखा परीक्षा) १, महाराष्ट्र, मुंबई (८० प्रती),
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) २, महाराष्ट्र, नागपूर (४० प्रती),
महालेखापाल (लेखा परीक्षा) २, महाराष्ट्र, नागपूर (४० प्रती),
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई (४० प्रती),
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई (५ प्रती),
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई,
राज्यपालांचे सचिव,
मुख्य मंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव,
सर्व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक,
*प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
*प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
*प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
मंत्रालयातील सर्व विभाग,
मंत्रालयाच्या निरनिराळ्या विभागांच्या अधीन असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयाचे प्रमुख,
वित्त विभागातील सर्व कार्यासने (ग्रंथपाल ५ प्रती),
निवड नस्ती, कार्यासन सेवा-९,

*पत्रान्वये.

**जोडपत्र**

**उदाहरण क्र. १.**—शासकीय कर्मचाऱ्याच्या अर्जित रजा खाती २३६ दिवस अर्जित रजा शिल्लक आहे व त्याने दिनांक २४ डिसेंबर पासून २५ दिवसांची अर्जित रजा घेतली. त्याच्या अर्जित रजा खाती पुढीलप्रमाणे जमा/वजावट होईल :—

| | | | |
|---|---|---|---|
| (अ) दिनांक २३ डिसेंबर रोजी शासकीय कर्मचाऱ्याच्या खाती शिल्लक अर्जित रजा | .. | २३६ दिवस | |
| (ब) वजा दिनांक २४ ते दिनांक ३१ डिसेंबर पर्यंत घेतलेली ८ दिवस अर्जित रजा | .. | (—) ८ दिवस | |
| ३१ डिसेंबर रोजी शिल्लक अर्जित रजा | .. | २२८ दिवस | |
| (क) १ जानेवारी रोजी आगाऊ जमा करावयाची १५ दिवस अर्जित रजा | .. | | (+) १५ दिवस |
| (ड) १ जानेवारी ते ३० जून या कालावधीमध्ये घेतलेली अर्जित रजा (१ जानेवारी ते १७ जानेवारी = १७ दिवस) | .. | | (—) *१७ दिवस |
| | | | (—) २ दिवस |
| (इ) शिल्लक अर्जित रजा .. .. .. | .. | **२२६ दिवस | |

*[१ जानेवारी ते १७ जानेवारी या कालावधीमध्ये घेतलेली अर्जित रजा १ जानेवारी रोजी आगाऊ जमा केलेल्या १५ दिवस अर्जित रजेशी प्रथम समायोजित केली आहे.]

**[असे समायोजन केल्यानंतर घेतलेली अर्जित रजा आगाऊ जमा करण्यात आलेल्या १५ दिवस अर्जित रजेपेक्षा जास्त येत असल्याने (२ दिवस) जास्तीची रजा ३१ डिसेंबर रोजी शिल्लक असलेल्या अर्जित रजेशी समायोजित केली आहे.]

**उदाहरण क्र. २.**—शासकीय कर्मचाऱ्याच्या अर्जित रजा खाती २४० दिवस अर्जित रजा शिल्लक आहे व त्याने ३० जूनपासून २९ दिवसांची रजा घेतली. त्याच्या अर्जित रजा खाती खालीलप्रमाणे जमा/वजावट होईल :—

| | | | |
|---|---|---|---|
| (अ) दिनांक २९ जून रोजी शासकीय कर्मचाऱ्याच्या खाती शिल्लक अर्जित रजा | .. | २४० दिवस | |
| (ब) वजा ३० जून रोजी घेतलेली रजा .. .. | .. | (—) १ दिवस | |
| ३० जून रोजी शिल्लक अर्जित रजा | .. | २३९ दिवस | |
| (क) १ जुलै रोजी आगाऊ जमा करावयाची १५ दिवस अर्जित रजा | .. | | (+) १५ दिवस |
| (ड) १ जुलै ते ३१ डिसेंबर या कालावधीमध्ये घेतलेली अर्जित रजा (१ जुलै ते २८ जुलै = २८ दिवस). | .. | | (—) *२८ दिवस |
| | | | (—) १३ दिवस |
| (इ) शिल्लक अर्जित रजा .. .. .. | .. | **२२६ दिवस | |

*[१ जुलै ते २८ जुलै या कालावधीमध्ये घेतलेली अर्जित रजा १ जुलै रोजी आगाऊ जमा केलेल्या १५ दिवस अर्जित रजेशी प्रथम समायोजित केली आहे.]

**[असे समायोजन केल्यानंतर घेतलेली अर्जित रजा आगाऊ जमा करण्यात आलेल्या १५ दिवस अर्जित रजेपेक्षा जास्त येत असल्याने (१३ दिवस) जास्तीची रजा ३० जून रोजी शिल्लक असलेल्या अर्जित रजेशी समायोजित केली आहे.]